**महानगरपालिका/नगरपरिषदा यांची नव्याने हद्दवाढ झालेल्या भागात नागरी सोयी सुविधांच्या विकास करण्यासाठी विशेष अर्थसहाय्य करण्याबाबत......**

(सन २०१४-१५)

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीईसी-१९१५/ प्र.क्र. ७/ नवि-४

मादा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय मुंबई ४००० ०३२.
तारीख: ८ जानेवारी,२०१५

वाचा

1) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०१२/प्र.क्र.२४/नवि-१६ दि.२७ जून,२०१२**
2) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१२/प्र.क्र.२४/नवि-१६ दि.१५ एप्रिल,२०१३**
3) **जिल्हाधिकारी, नागपूर यांचे क्रमांक डेक्स १२/एमयुएन ३/कावि ५५१/२०१४ दि.१६/७/२०१४ चे पत्र**
4) **शासन निर्णय क्रमांकः वानियो- २०१४/प्र.क्र.९४/नवि-४ दि.२१ जुलै,२०१४**

**प्रस्तावना**

राज्यातील महानगरपालिका/नगरपरिषदा यांच्या नव्याने हद्दवाढ झालेल्या भागात नागरी सोयी सुविधांच्या विकासाला चालना मिळावी अशा भागाकरीता सुनियोजित विकास व्हावा या हेतुने महानगरपालिका/नगपरिषदा यांच्या हद्दवाढ झालेल्या भागात नागरी सोयीसुविधांचा विकास करण्याकरिता विशेष अर्थसहाय्य योजना सध्या अमंलात आहे. सदर योजने खाली चालु आर्थिक वर्षात रु.१३.५० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतुद असुन त्यापैकी वित्त विभागाने रु.८.१० कोटी इतकी उपलब्ध करुन दिली आहे. संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये नागपूर महानगरपालिकेच्या हद्दीत नव्याने समावेश झालेल्या मौजे हुडकेश्वर (बु.) व नरसाळा येथे पाणी पुरवठा वितरण प्रणालीचे बळकटीकरण करणे व विधंन विहीरी खोदणेबाबत रु.६,७३,९२,२४७/- इतक्या रक्कमेचा प्रस्ताव विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली दि.५ जुलै,२०१४ रोजी झालेल्या सभेत मान्यता घेऊन शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे हुडकेश्वर (बु.) व नरसाळा येथे पाणी पुरवठा वितरण प्रणालीचे बळकटीकरण करणे व विधंन विहीरी खोदणेबाबत जिल्हाधिकारी,नागपूर यांनी सादर केलेल्या रु.६,७३,९२,२४७/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्यात येत आहे. या रक्कमे पैकी रु.२ कोटी, उपरोक्त अंदाजपत्रकीय किंमतीच्या (रु.६,७३,९२,२४७/-) २०% रक्कमे इतके नागपूर महानगरपालिकेचे अंशदान देण्यासंबंधीचा ठराव नागपूर महानगरपालिकेच्या महासभेच्या आगामी बैठकीत संमत करुन घेण्याच्या अटीच्या अधिन राहून, प्रस्तुत शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, नागपूर यांना नागपूर महानगरपालिका यांना देण्याकरिता वितरीत करण्यात येत आहे.

१) प्रस्तावात नमुद कामाच्या पूर्णत्वाचा अहवाल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात महालेखापाल तसेच शासनाकडे पाठविण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, नागपूर यांची राहील.

२) सदर कामावर करण्यात येणाऱ्या खर्चामुळे आदर्श आचारसंहितेचा भंग होऊ नये याद्दष्टीने जिल्हाधिकारी यांनी योग्य ती काळजी घ्यावी.

३) प्रस्तावित निधी विहित मुदतीत पूर्ण खर्च होईल हयाची पडताळणी करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, नागपूर यांची राहिल.

४) वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहित प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी.

५) निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/टेडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियांचे अवलंबुन/ वित्तीय अधिकारांच्या (financial power) मर्यादेत / P.W.D. मॅच्युअलचे अधीन राहून/C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार/ CAG च्या निर्देशानुसार/ प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/ तरतुदीनुसार /बजेट व कोषागार नियमावली नुसार खर्च करण्याची जबाबदारी तसेच कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग/ अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची दक्षता घेण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, नागपूर यांची राहील.

उपरोक्त निधी कोषागर कार्यालयातून आहरित व वितरीत करण्यासाठी जिल्हाधिकारी, नागपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी घोषीत करण्यात येत आहे.

याकरीता होणारा खर्च मागणी क्र.एफ-२ मुख्यलेखाशिर्ष २२१७ नगर विकास, १९१ महानगरपालिका सहाय्य (००) (६४) हद्दवाढ झालेल्या महानगरपालिकांना नव्याने समाविष्ट क्षेत्रात नागरी सुविधा पुरविण्यासाठी सहाय्य (२२१७९४८३) या योजनेखाली सन २०१४-१५ वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१८१/शिबीर कार्यालय नागपूर/ व्यय-३ दि.२०/१२/२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201501081036347725 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Hanmant Padhye

Digitally signed by Rajesh Hanmant Padhye
DN: CN = Rajesh Hanmant Padhye, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.01.08 12:00:55 +05'30'

प्रत,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंबई

२. मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,

३. जिल्हाधिकारी, नागपूर,जि. नागपूर

४. आयुक्त, नागपूर महानगरपालिका जि.नागपूर

५. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

६. महालेखाकार (लेखा व कोषागारे) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई

८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर जि.नागपूर

९. वित्त विभाग, व्यय-३/कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६मंत्रालय, मुंबई

१०.निवडनस्ती (नवि-४)